संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, मुंबई यांच्या अधिपत्याखालील सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण प्रादेशिक कार्यालय, नाशिक, नागपूर, अमरावती विभागातील शासकीय तंत्र विद्यालयातील गट-क संवर्गातील कर्मचाऱ्यांच्या प्रशिक्षण कार्यक्रमाकरीता रु. १०.९८ लाख या रक्कमेस खर्च करण्यास प्रशासकीय मान्यता देणेबाबत...

महाराष्ट्र शासन
कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग,
शासन निर्णय क्रमांक आयटीआय-२०२४/प्र.क्र. १६२/व्यशि-३,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २४ मार्च, २०२५

वाचा :

१. सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्र. टिआरएन-२०२३/प्र.क्र.६६/२३/१२-अ दि. २७.०९.२०२३
२. संचालक,व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्र.व्यशिप्र-२०२४ /आस्था-४/गट-क प्रशिक्षण/२२०३३४७१/का-४/२० दि.२७.२.२०२५ यांचे पत्र
३. संचालक,व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्र.व्यशिप्र-२०२४ /आस्था-५/गट-क प्रशिक्षण/२२०३३४७१/का-४ /२६ दि.१३.३.२०२५ यांचे पत्र

प्रस्तावना :

राज्य शासन सेवेत सर्व स्तरावर कार्यक्षमता वाढवून गतिमान प्रशासन होण्याकरीता राज्यातील कर्मचारीवृंद यांना प्रशिक्षण देण्याची आवश्यकता आहे. आर्थिक, सामाजिक व तांत्रिक बदलांमुळे निर्माण होणाऱ्या आव्हानांना सामोरे जाणे व प्रशासनामध्ये बदलासाठी आवश्यक असणारी लवचिकता साध्य करणे यासाठी सर्व स्तरावर प्रशिक्षण देणे गरजेचे आहे.

२. संदर्भ क्र. १ च्या शासन निर्णयान्वये राज्य प्रशिक्षण धोरण-२०११ नुसार यशदा, पुणे (शिखर संस्था) तसेच विभागीय व जिल्हा स्तरावर घोषित करण्यात आलेल्या प्रशिक्षण संस्थांचे निवासी प्रशिक्षण शुल्काचे दर सुधारित करण्यात आले आहे.

३. संदर्भ क्र. २ अन्वये संचालक व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय यांनी दिलेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने प्रादेशिक कार्यालय नाशिक, नागपूर व अमरावती या प्रादेशिक विभागातील त्यांच्या अधिपत्याखालील शासकीय तंत्र विद्यालयातील गट-क तांत्रिक संवर्गातील नवनियुक्त कर्मचाऱ्यांच्या प्रशिक्षण आयोजित करण्याबाबत व त्याकरीता येणाऱ्या खर्चास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय** :

संचालक व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय यांच्या अधिपत्याखालील प्रादेशिक कार्यालय नाशिक, नागपूर व अमरावती या प्रादेशिक विभागातील शासकीय तंत्र विद्यालयातील संस्थेतील गट-क संवर्गातील तांत्रिक संवर्गातील नवनियुक्त कर्मचाऱ्यांचे प्रशिक्षण आयोजित करण्यास खालीलप्रमाणे मान्यता देण्यात येत आहे.

(रुपये लाखांत)

| अ. क्र. | विभाग | प्रशिक्षणाचा प्रकार | प्रशिक्षणाचे ठिकाण | कर्मचारी संख्या | प्रशिक्षण कालावधी | प्रतिदिन दर | एकूण खर्च |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | नाशिक | निदेशक (पूर्व व्यावसायिक अभ्यासक्रम) करीता Orientation Program | विभाग स्तरावरील प्रशिक्षण संस्था नाशिक | ५३ | ०५ दिवस | १८०० | ४.७७ |
| २ | नागपूर | | शासकीय तंत्र निकेतन नागपूर | ४० | ०५ दिवस | १८०० | ३.६० |
| ३ | अमरावती | | डॉ. पंजाबराव देशमुख प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती | २९ | ०५ दिवस | १८०० | २.६१ |
| | | | | **१२२** | | | **१०.९८** |

सदर प्रशिक्षणास खालील अटी व शर्तीच्या अधिन राहून मान्यता देण्यात येत आहे.

१. या योजनेंतर्गत शासकीय औदयोगिक प्रशिक्षण संस्थामधील कर्मचारी व शिक्षकीय कर्मचाऱ्यास प्राधान्य देण्यात यावे.

२. हे प्रशिक्षण कार्यक्रम जिल्हा/विभागीय स्तरावर व सर्व सोयी सुविधा उपलब्ध असलेल्या ठिकाणी घेण्यात यावे.

३. प्रशिक्षण कार्यक्रमामध्ये संबंधित व्यवसाय अभ्यासक्रमाचे अद्यावत ज्ञान , आधुनिक दृकश्राव्य माध्यमांचा उपयोग, सूचनात्मक साहित्य, शिकविण्याच्या नविन पध्दती/ तंत्रज्ञान, मानसशास्त्रीय बाबी तसेच प्रशिक्षणार्थ्यांना हाताळण्याच्या पध्दती इत्यादींचा अंतर्भाव करण्यात यावा.

४. अधिकाऱ्यांना देण्यात येणाऱ्या प्रशिक्षणामध्ये नेतृत्व विकास, प्रशासकीय व आर्थिक बाबी, विद्यार्थी हित, सुप्रशासन व व्यवस्थापकीय कौशल्य इत्यादी बाबीचा समावेश करण्यात यावा.

५. अधिकारी/ कर्मचारी यांना सुरक्षेचे प्रशिक्षण देऊन दुर्घटनाची संख्या कमी करणे.

६. अधिकारी/कर्मचारी यांना अद्यावत सयंत्रे आणि उपकरणे कार्यक्षमतेने हाताळण्यासाठी प्रशिक्षण देण्यात यावे.

७. अधिकारी/कर्मचाऱ्यांना शासन नियम, माहिती अधिकार अधिनियम-२००५ कायदा, न्यायालयीन प्रकरणे, वित्तिय, भांडार व्यवस्थापन, आस्थापना विषयक बाबी, प्रशासकीय बाबी हाताळणे,उन्नत तंत्रज्ञानाची ओळख व कौशल्याचे प्रशिक्षण इत्यादी बाबींचा समावेश करावा. तसेच समुपदेशन, सकारात्मक द्दष्टिकोन, मुल्यमापन प्रक्रिया, खाजगी औदयोगिक आस्थापनांसोबत सुसंवाद,सामान्य कौशल्य, उदयोजकता, शिकाऊ उमेदवारी प्रशिक्षण, रोजगार व स्वयंरोजगार यांचा समावेश करण्यात यावा. प्रेरणा व सेवा प्रशिक्षण (Induction & Service Training) चा अंतर्भाव करण्यात यावा. सदर प्रशिक्षण कार्यक्रमाचा कालावधी गरजेनुसार निश्चित करण्यात यावा. आवश्यकता भासल्यास सदर प्रशिक्षणासाठी या क्षेत्रातील बाहेरील तज्ञ मार्गदर्शकांना आमंत्रित **करण्यात यावे** .

८. नवीन तंत्रज्ञानानुसार झालेल्या बदलानुसार शिल्प निदेशकांसाठीच्या कार्यक्रमामध्ये त्यांच्याशी संबंधित औद्योगिक आस्थापना सुसंगत प्रशिक्षण देण्यात यावे .

९. या कार्यक्रमांत आधुनिक व नाविन्यपूर्ण अशी प्रयोगशाळा (उदा. संवाद प्रयोगशाळा, डिजीटल लायब्ररी, प्राजेक्ट लॅब) उभारण्यात यावी. कार्यशाळा व परिषद यावर अनुषंगिक खर्च करण्यात यावा.

१०. अ) प्रशिक्षण कार्यक्रमांच्या खर्चाची कमाल मर्यादा प्रति प्रशिक्षणार्थी, प्रति दिन रु. १८००/- इतकी असून यामध्ये शैक्षणिक साहित्य, तज्ञाचे मानधन, त्यांचा प्रवास व राहण्याचा खर्च, तसेच जागेचे भाडे, स्टेशनरी, छपाई, आस्थापना भेटी व इतर सुविधांवरील खर्च यांचा अंतर्भाव राहील.

ब) अधिकारी व कर्मचारी यांच्या प्रवास व दैनंदिन भत्याचा खर्च शासनाच्या प्रचलित नियमानुसार लागू राहील .

२. या प्रशिक्षण कार्यक्रमावर होणारा खर्च सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात मागणी क्र. झेडए-०२, २२०३-तंत्र शिक्षण, (०१)(०१) कर्मचारी वर्गाचे प्रशिक्षण (कार्यक्रम), २२०३३४७१, १३-कार्यालयीन खर्च या उद्दिष्टामधून वित्त विभागाव्दारे उपलब्ध होणाऱ्या तरतूदीमधून संचालनालयाच्या अधिपत्याखालील प्रादेशिक कार्यालय नाशिक, नागपूर व अमरावती यांना त्यांच्या विभागातील प्रशिक्षणाकरीता इतकी रक्कम प्रशिक्षणाकरीता रु. १०.९८ लाख (अक्षरी रुपये दहा लाख अठ्ठ्याण्णव हजार फक्त) खर्च करण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. सदर खर्च बीम्स प्रणालीवर उपलब्ध होणाऱ्या तरतुदीमधून भागविण्यात यावा.

३. आहरण व संवितरण अधिकारी लेखाधिकारी, प्रादेशिक कार्यालय, नाशिक, नागपूर व अमरावती यांनी सदर योजनेसाठी उपलब्ध होणारा निधी खर्च करण्याची दक्षता खालील अटी व शर्तीच्या अधिन राहून घ्यावी.

३.१ संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, मुंबई यांनी प्रशिक्षणाबाबतच्या खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास विहीत कालावधीत सादर करावे.

३.२ वित्त व नियोजन विभाग यांनी वेळोवेळी निर्गमित केलेले आदेश, सूचना, परिपत्रके, अटी व शर्तींचे कोटेकोरपणे पालन करावे.

४. औद्योगिक प्रशिक्षण संस्थामधील प्रशिक्षणास खर्चास वित्त विभागाच्या वित्तिय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग- पहिला, उप विभाग-चार, खर्चाच्या संकीर्ण बाबी संबंधी प्रदान करण्यात आलेले वित्तीय अधिकार यामधील अ.क्र. १० अन्वये भारतातील प्रशिक्षण फी वरील खर्च मंजूर करण्यास प्रशासनिक विभागास प्रदान केलेल्या वित्तिय अधिकारान्वये मंजूरी देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०३२४१३०५५८४८०३ असा आहेहा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने .

AMEY ANIL GAWADE

Digitally signed by AMEY ANIL GAWADE
DN: CN = AMEY ANIL GAWADE, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = SKILLS EMPLOYMENT ENTREPRENEURSHIP AND INNOVATION DEPARTMENT
Date: 2025.03.24 13:12:43 +05'30'

**(अमेय गावडे)**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. अपर मुख्य सचिव, कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग, मंत्रालय, मुंबई
२. विशेष कार्य अधिकारी, कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग, मंत्रालय, मुंबई
३. कक्ष अधिकारी, व्यशि-१, कौशल्य , रोजगार, उदयोजकता व नाविन्यता विभाग, मंत्रालय, मुंबई
४. संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५. सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय नाशिक/ अमरावती/नागपूर.
६. जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी, जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण कार्यालय (संचालनालयामार्फत)
७. निवड नस्ती, व्यशि-३